**नागपूर विभागातील महाराष्ट्र विकास सेवा, गट-ब मधील अधिकाऱ्यांच्या बदल्या/ नियुक्त्या.**

# महाराष्ट्र शासन

ग्रामविकास व जलसंधारण विभाग,
शासन आदेश क्र. : मविसे १०/२०११/प्र.क्र.९४/आस्था-३ अ,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक: १५ डिसेंबर, २०११

**संदर्भ:**- १. शासन आदेश समक्रमांक दि.२८ सप्टेंबर, २०११

२. श्री.आर.डी.बागडे यांचा दि.१४.१०.२०११ चा विनंती अर्ज

**आदेश:**- सार्वजनिक सेवेच्या हितार्थ महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील तरतुदीनुसार बदली करण्यास सक्षम असलेल्या प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने आणि पदावधी पूर्ण होण्यापूर्वी बदली प्रस्तावित असलेल्या अधिकाऱ्यांच्या बाबतीत कलम ४(४) व (५) मधील तरतुदीनुसार सक्षम प्राधिकाऱ्याच्या पूर्वमान्यतेने ग्रामविकास व जलसंधारण विभागातील खालील अधिकाऱ्याच्या बदलीचे आदेश शासन देत आहे. बदलीनंतर संबंधित अधिकाऱ्याची नियुक्ती त्यांच्या नावासमोरील स्तंभ क्रमांक ४ मध्ये दर्शविलेल्या पदावर करण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव | सध्याचे पद व ठिकाण | बदलीने नियुक्तीचे पद व ठिकाण | शेरा |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | श्री.आर.डी.बागडे | बाल विकास प्रकल्प अधिकारी, काटोल, जि. नागपूर | गट विकास अधिकारी, पंचायत समिती, लाखणी, जि. भंडारा | उक्त संदर्भीय क्र.१ च्या दि.२८.९.२०११ च्या आदेशात अंशतः बदल करून रिक्त पदावर |

२. संबंधित अधिकाऱ्यांनी त्यांच्या नवीन पदाचा पदभार त्वरीत स्वीकारावा. तसेच त्यांनी अनधिकृत रजेवर जाऊ नये. त्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभागाच्या क्रमांक: सीडीआर १०८२/ २५६७/ २८/ अकरा, दि.३०.८.१९८२ च्या परिपत्रकाकडे वेधण्यात येत आहे. त्यात दिलेल्या सूचना लक्षात घेऊन बदली रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास, ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील याची त्यांनी नोंद घ्यावी.

३. संबंधित विभागीय आयुक्त/ मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी बदली झालेल्या अधिकाऱ्याला त्यांच्या सध्याच्या पदभारातून पदमुक्त करावे व त्यांना नवीन नेमणूकीच्या जागी तात्काळ रुजू होण्यास सांगावे.

४. संबंधित अधिकाऱ्याने नवीन नियुक्तीच्या ठिकाणी हजर व्हावे व पदभार स्वीकारल्याचा दिनांक शासनास कळवावा.

५. सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१११२१५०९१८२४००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( मा. ना. पवार)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. विभागीय आयुक्त, नागपूर विभाग. नागपूर
२. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नागपूर, भंडारा

३. मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, नागपूर, भंडारा
४. महालेखापाल २ (लेखा परीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर
५. संबंधित अधिकारी (द्वारा मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद)
६. मा.मंत्री (ग्रामविकास) यांचे खाजगी सचिव
७. मा. राज्यमंत्री (ग्रामविकास) यांचे खाजगी सचिव
८. सचिव (ग्रामविकास व पंचायत राज) यांचे स्वीय सहायक
९. कार्यासन क्रमांक आस्था-२/ योजना-५, ग्रामविकास व जलसंधारण विभाग
१०. निवडनस्ती, का.क्र.आस्था-३ अ, ग्रामविकास व जलसंधारण विभाग